# फियोनाचं भाग्य

लेखिका: टेरेसा बेटमन

चित्रे: केली मर्फी



कुण्या एके काळी आयर्लंडमध्ये भाग्य सूर्यप्रकाशासारखं मोफत होतं आणि विपुल प्रमाणात मिळत होतं. याचं श्रेय जात होतं *लेपरेकॉन* (आयरीश लोककथेतील अद्भूत खुजा मांत्रिक) लोकांना. पण मग लोभी लेपरेकॉनच्या राजाने मंत्र म्हणून भाग्य सीलबंद करुन ठेवलं. भाग्याविना संपूर्ण देश निराश झाला.

याच काळात आयर्लंडमध्ये फियोना नावाची मुलगी राहात होती. लेपरेकॉन राजाकडून भाग्य प्राप्त करणं कठीण आहे, हे ती जाणत होती. पण फियोना चतुर होती – आणि काही वेळा मुलींकडे असं चातुर्य असणं खूप गरजेचं असतं.

# फियोनाचं भाग्य

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



कुण्या एके काळी आयर्लंडमध्ये भाग्य हे सूर्यप्रकाशासारखंच मोफत आणि विपुल प्रमाणात मिळत असे. भाग्य हवेत तरंगत असे आणि कुणीही गरज लागेल तेव्हा मूठभर भाग्य हवेतून काढून घेऊ शकत असे. हे बरंचसं *लेपरेकॉन* (आयरीश लोककथेतील अद्भूत खुजा मांत्रिक) लोकांमुळे शक्य होत असे. कारण ते भाग्य बनवत असत, गाय जशी दूध बनवते तसंच!



एकदा आयर्लंडमध्ये मोठ्या आकाराचे लोक आले. ते एवढे मोठे होते की कुठेही गेले तरी भाग्य त्यांच्यासोबत सतत चिकटलेलं असे.

“काहीतरी करायला पाहिजे,” लेपरेकॉनच्या राजाने निर्णय घेतला. “या मोठ्या लोकांना आपल्या भाग्याचं शोषण करू देणं योग्य नाही. मग आपल्यासाठी काय उरेल?”



राजाच्या आदेशानुसार, लेपरेकॉन लोकांनी सोनेरी धाग्यांचं जादुई जाळं विणलं. मग एकदा भर उन्हाळात संध्याकाळी, भाग्य आपल्या शिखरस्थानी असताना, त्यांनी सगळं भाग्य जाळ्यात पकडून गोळा केलं. हे भाग्य त्यांनी राजाच्या सिंहासनाजवळ असलेल्या ओक वृक्षाच्या लाकडी पेटाऱ्यात बंद केलं. आता राजा त्याला वाट्टेल तिथे आणि वाट्टेल तेव्हा हे भाग्य वाटू शकत होता.



पण लेपरेकॉन लोकांनी केलेलं हे काम त्यांनाच नुकसानकारक ठरलं. त्यांनी हवेत तरंगणारं सगळंच भाग्य त्या पेटाऱ्यात सीलबंद केलं होतं.

त्यामुळे आयर्लंडची भूमी मोठ्या संकटात सापडली. कोंबड्यांनी अंडी देणं बंद केलं, गायींनी दूध देणं थांबवलं आणि मातीत रुजवलेले बटाटे सडून गेले.

याच काळात आयर्लंडमध्ये *फियोना* नावाची एक मुलगी राहात होती. भाग्याची कमतरता लेपरेकॉन लोकांच्या कृत्यामुळे निर्माण झाली होती, हे तिने ओळखलं. म्हणजे फक्त लेपरेकॉन लोकच त्यांच्या देशाला पुन्हा भाग्य बहाल करू शकत होते.

पण लेपरेकॉनकडून भाग्य परत मिळवणं, हे म्हणजे दगड पिळून पाणी गाळण्यासारखं जिकीरीचं काम होतं. हे काम अशक्य नव्हतं, पण त्यासाठी क्षमतेपेक्षा जास्त बळ असायला पाहिजे. काहीवेळा चातुर्य हे बळापेक्षा जास्त उपयोगी ठरतं.

फियोनाने आपल्याकडच्या शिल्लक पैशातून एक गाय आणि काही कोंबड्या विकत आणल्या. दररोज सकाळी आणि संध्याकाळी, ती गायीला शेतात नेऊ लागली. तिथून ती बाहेर येई तेव्हा तिच्यासोबत दोन बादल्या काठोकाठ भरलेलं पांढरंशुभ्र चुन्याचं पाणी असे.

“होय, ही खूप चांगली गाय आहे,” कुणी विचारलं तर फियोना म्हणत असे. “अशी गाय मिळाली हे माझं भाग्यच आहे.”

लवकरच, अफवा पसरू लागल्या - लोकांकडे भाग्याची कमतरता आहे, मग फियोनाकडे एवढं बादल्या भरून भाग्य कुठून आलं?



दररोज सकाळी फियोना कोंबड्यांच्या खुराड्यात जात असे आणि सोबत तट्ट फुगलेली बंद टोपली घेऊन बाहेर येत असे.

“माझ्या कोंबड्या खूप समाधानी आहेत,” तिने शेजाऱ्यांना सांगितलं. “माझ्याकडे अशा कोंबड्या आहेत, हे माझं भाग्यच आहे.”

लवकरच अफवा पसरल्या - इतरांकडे भाग्याची कमतरता असताना फियोनाकडे मात्र टोपली भरभरून भाग्य आहे!



मग फियोनानो आपल्या बागेत खोदकाम सुरू केलं. त्यातून निघालेली मातीची ढेकळं तिने आपल्या ढकलगाडीत भरली.

“हे वर्ष बटाट्यांसाठी बरं गेलं नाही,” फियोनाने येणाऱ्याजाणाऱ्या लोकांना सांगितलं. “तरीही, मी भाग्यवान आहे की माझ्याकडे गरजेपुरतं आहे.”

आता अफवांना जणू पंखच लागले – इतर लोकांकडे भाग्याची कमतरता आहे आणि फियोनाकडे मात्र ढकलगाडीएवढं भाग्य आहे!



फियोनाच्या भाग्याची बातमी लेपरेकॉन राजापर्यंत पोहोचली.

एकदा फियोना हिरव्या कुरणामध्ये चालत होती. अचानक तिला आपण खुजा लोकांनी घेरलो गेलो आहोत, असं जाणवलं. एकाच क्षणात त्यांनी तिच्या स्कर्टची कडा धरली आणि ते गोल गोल फेऱ्या मारू लागले. स्कर्ट गुडघ्यांवर लपेटला जाऊ नये म्हणून फियोना वळली. ती वळताक्षणी, तिच्या डोळ्यांसमोरचं दृश्य धूसर झालं. तिला स्पष्ट दिसू लागलं तेव्हा आपण जमिनीच्या खाली लेपरेकॉन राजाच्या सिंहासन खोलीत आहोत, असं दिसलं.



ती खोली म्हणजे एक आलिशान गुहा होती. त्यात उंच ग्रॅनाईटच्या भिंतींवर महागडी नक्षीदार कापडी चित्रं टांगली होती. फरशी दागिन्यांनी सजवलेली होती. मशाली आणि मेणबत्त्यांच्या प्रकाशात सगळं चमकत होतं आणि मधुर संगीत वाजत होतं. फियोनाच्या समोरच सिंहासनावर लेपरेकॉन राजा बसला होता. राजाने फियोनाला खूण करून जवळ बोलावलं. फियोना पुढे गेली. तिने सभोवती पाहिलं. तिचे डोळे लपवून ठेवलेलं भाग्य शोधत होते. तिला खात्री होती की राजाने भाग्य आपल्या अगदी जवळ ठेवलं असणार. फियोनाने राजाला अभिवादन केलं तेव्हा तिला ओकच्या लाकडाचा पेटारा दिसला. पेटारा थोडा चमकत होता, कारण त्या जादुई पेटाऱ्याला एखाद्या मंत्रानेच सीलबंद करणं शक्य होतं. हे जगजाहीर होतं की कोणतंही कुलूप फार काळ भाग्याला बंद ठेवू शकत नाही.

“आपल्याला माझ्याकडून काय पाहिजे?” फियोनाने विनम्रतेने विचारलं.

राजाने आढ्यतेने विचारलं, “तुला तुझं भाग्य कुठून मिळतं? कोण देतं ते तुला आणि का?”



फियोनाचे डोळे निरागसपणे मोठे झाले. “माझ्याकडे कोणतंही भाग्य नाही,” तिने स्पष्ट केलं. “खरंच, याक्षणी मी लेपरेकॉन लोकांची बंदी आहे. यालाच भाग्य म्हणायचं असेल तर तुम्ही ते काढून घेऊ शकता.”

“तू ठामपणे म्हणतेयस का की तुझ्याकडे भाग्य नाही?” राजाने भुवई उंचावून विचारलं. “ठीकाय, आपण चाचणी घेऊया. तू खोटं बोलतेयस असं मी सिद्ध केलं तर शिक्षा म्हणून तुझ्याकडे असलेलं सगळं भाग्य मी हिरावून घेईन आणि बाकी भाग्यासोबत ठेवून देईन,” असं म्हणताना राजाचे डोळे पेटाऱ्याकडे वळले.



फियोनाला थोडा राग आला. “हा काही चांगला सौदा नाही,” ती म्हणाली, “तरीही मी नियमांना मानते. मी चाचणीत खोटी पडले तर मला शिक्षा, दंड व्हायलाच हवा. पण मी खोटं बोलले नाही, मी खरी आहे हे सिद्ध झालं तर आपल्याला माझी एक इच्छा पूर्ण करावी लागेल.”

राजाने नजर तिरकी केली. “मान्य,” तो धूर्तपणे म्हणाला, “जर चाचणीत मी खोटा ठरलो तर तुझ्याकडे असलेल्या भाग्याइतक्या किमतीची तुझी इच्छा मी पूर्ण करीन.”

फियोना जाणत होती की राजा तिला फसवत आहे. पण एक चतुर मुलगी लेपरेकॉन राजाची चलाखी त्याच्यावरच उलटवू शकते. तिने पेटाऱ्याकडे एकवार पाहिलं आणि हसत हसत मान डोलावली.



मग करारपत्र करण्यात आलं. राजाच्या इशाऱ्यानुसार, एका जादुगाराने टेबल आणलं आणि त्यावर तीन सुंदर शिंपले ठेवले. एका शिंपल्याखाली त्याने एक सोन्याचं नाण लपवलं. मग त्याने तिन्ही शिंपले इतक्या वेगाने वर-खाली, डावी-उजवीकडे फिरवले की आधीचा कोणता शिंपला आता कुठे आहे, हे कुणालाही सांगता आलं नसतं.

“आता,” राजा म्हणाला. “सोनं कुठे आहे?”

योग्य शिंपला निवडण्याची शक्यता एक-तृतीयांश इतकी होती. चांगलं भाग्य असणाऱ्या व्यक्तिला दरवेळीच सोनं सापडलं असतं. थोडंसं भाग्य असलेल्या व्यक्तीला कधीकधीच सोनं मिळालं असतं. पण हा खेळ अनेकवेळा खेळूनही फियोनाला सोन्याचं नाणं काही सापडलं नाही. जणू काही तिचं भाग्यच नव्हतं.



“आणखी एक चाचणी,” राजाने आदेश दिला.

एक लेपरेकॉन हार्प वाद्य आणण्यात आलं. लेपरेकॉन वाद्य हे वाजवणाऱ्याच्या भाग्याच्या आधारे धुन बनवतं. भाग्य चांगलं असेल तर नुसत्या तारा छेडून चांगली धुन बनते. भाग्य कमी असेल तरीही व्यक्ती एखादी साधीशी धुन वाजवू शकते. पण फियोनाच्या हातात आल्यावर ते वाद्य बेसूर झालं. तिने तारा कशाही छेडल्या, वाजवल्या तरी त्यातून फक्त कर्कश आवाजच बाहेर निघू लागले.



राजा थरथरला आणि क्रोधीत झाला. त्याने काय चूक केली असावी? कदाचित शेवटची चाचणी तो खरा आहे, हे सिद्ध करेल.

“बुद्धिबळाचा पट आणा!” त्याने आदेश दिला.

तो आणि फियोना पटाच्या दोन बाजुंना एकमेकांसमोर बसले. राजाने सुरुवातीची चाल खेळली. राजाला कुणी हरवेल असं कुणालाही वाटत नव्हतं कारण त्याच्याकडे भाग्य भरभरून होतं. पण चांगलं भाग्य असलेली व्यक्ती काहीवेळ तरी त्याच्यासमोर टिकू शकली असती. कमी भाग्य असलेली व्यक्तीसुद्धा दोन-चार चांगल्या चाली खेळू शकली असती.

राजाने हरण्याची पराकाष्ठा केली. तरीही फियोना दोन मिनिटांच्या आतच वाईट पद्धतीने हरली.



राजाने हैराण होऊन तिच्याकडे पाहिलं. “तुझ्याकडे तर काहीच भाग्य नाही!” तो म्हणाला. “पण मग दूध, अंडी आणि बटाटे कसे मिळाले तुला?”

फियोनाने उसासा टाकला. “जर मी माझी दुधाची बादली चुन्याच्या पाण्याने भरली, अंड्याची टोपली फळांनी भरली आणि ढकलगाडी दगडांनी भरली तर कुणाला आक्षेप आहे का? मी आपल्याला सांगितलं की माझ्याकडे भाग्य नाही आणि मी खोटं बोलले नाही. आता माझी इच्छा असलेली गोष्ट मला द्या आणि मला घरी जाऊ द्या.”

राजाने सावकाश मान डोलावली. “खरंच, तुझी इच्छा पूर्ण करण्याचं मी वचन दिलं होतं तुला. पण तुझ्याकडे असलेल्या भाग्याइतक्याच किंमतीची तुझी इच्छा मी पूर्ण करीन, असं मी म्हणालो होतो. तुझ्याकडे भाग्य नाही, हे तू आत्ताच सिद्ध केलंयस. त्यामुळे तू आता एवढीच इच्छा मागू शकतेस – काहीच नाही!”



राजा स्वत:च्या चातुर्यावर हसला. कारण त्याचा तर्क कराराच्या मर्यादेत बसत होता. पण मग त्याचं हसू डगमगलं, कारण फियोनासुद्धा हसत होती.

“मग मी *काहीच नाही* ही इच्छा मागू शकते ना?” तिने विचारलं.

गोंधळून राजाने मान डोलावली.

“मग मला एक भोक हवंय,” फियोना बोलू लागली. “भोक म्हणजे *काहीच नाही* असतं ना! तीच तर माझ्या इच्छेची किंमत आहे. मला असं भोक द्या जे कधीच नाहीसं होणार नाही. त्या लाकडी पेटाऱ्याच्या झाकणाचं भोक मला द्या!”

असं म्हणत तिने राजाच्या सिंहासनाजवळ ठेवलेल्या भाग्याच्या लाकडी पेटाऱ्याकडे बोट दाखवलं.

योग्य पद्धतीने मागण्यात आलेल्या इच्छेचा कधी अस्वीकार करता येत नाही. लगेच पेटाऱ्याला एक भोक दिसू लागलं आणि त्यातून भाग्य बाहेर निसटू लागलं.





राजा रागाने लालेलाल झाला. पण आता तो करू तरी काय शकणार होता? त्याने करार केला होता आणि तो त्याला पाळावाच लागणार होता. राजाने रागारागात आपला हात हलवला, ज्यामुळे फियोना एका भोवऱ्यात गरगरू लागली. तिने डोळे उघडले तेव्हा ती पुन्हा कुरणात होती आणि सूर्य डोंगराआडून उगवत होता. आज तिला सूर्याची किरणं थोडी जास्तच चमकताना दिसली आणि गवत रोजच्यापेक्षा जास्तच हिरवंगार भासलं.

आणि याच कारणामुळे, त्या दिवसापासून आजपर्यंत, तुम्हाला आयर्लंडच्या आसपास नेहमी काही भाग्य मुक्तपणे भटकत असताना दिसेल. कारण पेटाऱ्याला आजही भोक आहे आणि राजाला आपलं वचन पाळावंच लागत आहे.

पण फियोनाच्या बाबतीत – तिनेच म्हटल्याप्रमाणे, “भाग्य चांगली गोष्ट आहे, पण मला माझ्या चातुर्यावरच अवलंबून राहायला आवडेल.”



समाप्त